मा. राज्यपाल कार्यालयातील सह सचिव/उपसचिव (वै.वि.म.) व सहसचिव/उपसचिव (शिक्षण) यांना ठोक भरपाई मंजूर करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- संकिर्ण-२०१६/४६०/प्र.क्र.१३२/२०-अ**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक - ०८ फेब्रुवारी, २०१९

**वाचा:**

शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक-चवक-१०१३/प्र.क्र.१७/सेवा-३, दिनांक १०.७.२०१३

**प्रस्तावना:**

मंत्रालयीन विभागातील सहसचिव/उप सचिव व त्या समकक्ष अधिकारी यांना श्रेणीवेतनानुसार ठराविक दराने एकत्रित ठोक भरपाई रक्कम मंजूर करण्याची तरतूद वित्त विभागाच्या दिनांक १०.७.२०१३ च्या शासन निर्णयान्वये करण्यात आली आहे. त्याच धर्तीवर मा. राज्यपालांचे सह सचिव/उपसचिव (वै.वि.म.) व सहसचिव/उपसचिव (शिक्षण) यांना ठोक भरपाई रक्कम मंजूर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:**

मा. राज्यपालांचे कार्यालय येथील सह सचिव/उप सचिव ( वै.वि.म.) व सहसचिव/ उपसचिव (शिक्षण) यांना निवासी दूरध्वनी, इंटरनेट (निवासी मोबाईल), निवासी शिपायाऐवजी रोख भत्ता, वर्तमानपत्रे, नियतकालिके, मासिके, निवासी केबल, निवासी संगणक व त्याची देखभाल, लॅपटॉप, आयपॅड व त्याची देखभाल, डाटा कार्ड, निवासी प्रिंटर, प्रिंटरसाठी लागणारा टोनर व इतर स्टेशनरी तसेच या उपकरणांच्या वापराच्या अनुषंगाने शासन निर्णय वित्त विभाग दिनांक १०.७.२०१३ मधील तरतुदी नुसार व त्यामधील अटी शर्तीनुसार एकत्रित ठोक भरपाई रक्कम दरमहा देण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे.

२. संबंधित अधिकारी राजभवन मध्ये सह सचिव/उप सचिव ( वै.वि.म.) व सहसचिव/ उपसचिव (शिक्षण) या पदावर प्रतिनियुक्तीने आल्यास संबंधित अधिकाऱ्यास प्रतिनियुक्ती कालावधीपुरती वरीलप्रमाणे ठोक भरपाई रक्कम अनुज्ञेय राहील. संबंधित अधिकारी राजभवनबाहेरील त्याच्या मुळ पदावर प्रत्यार्पित झाल्यानंतर त्याला त्याच्या मुळ पदास अनुज्ञेय भत्ते अनुज्ञेय राहतील.

३. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक अनौ/सं.क्र.५०४/१८/सेवा-३, दिनांक १९.११.२०१८ अन्वये मिळालेल्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१९०२१११६२२३२१२०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Satish Karbhari Jondhale

Digitally signed by Satish Karbhari Jondhale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=GAD Protocol, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=96b5b527d7131539d3b3eb3ba523bb3514dd3d3437a78ac0f73c6d8043215729, cn=Satish Karbhari Jondhale
Date: 2019.02.11 16:24:30 +05'30'

**( सतीश जोंधळे )**
सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.

२) महालेखापाल, महाराष्ट्र-१ व २ (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, मुंबई/नागपूर

३) महालेखापाल, महाराष्ट्र-१ व २ (लेखा परिक्षा) महाराष्ट्र, मुंबई/नागपूर

४) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई

५) वित्त विभाग/सेवा-३, मंत्रालय, मुंबई-३२

६) निवडनस्ती.